सन २०१६-१७ करीता राज्यातील विभागीय / जिल्हा क्रीडा संकुलांसाठी निधी वितरित करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१७/प्र.क्र.५३/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.राक्रीधो २००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो २००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.
३) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.विजिक्रीसं/निमा/निवि/२०१६-१७/१६/का-९, दिनांक २९ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

राज्याचे क्रीडा धोरण २००१ अंतर्गत तालुका स्तरावर तालुका क्रीडा संकुल यामध्ये विविध खेळाच्या किमान सुविधा उपलब्ध करुन देणे, जिल्हा स्तरावर जिल्हा क्रीडा संकुलांतर्गत राष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देणे, त्याचप्रमाणे विभागीय स्तरावर विभागीय क्रीडा संकुलांतर्गत आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उभारण्याची योजना दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. दिनांक २१ मार्च, २००९ च्या शासन निर्णयानुसार तालुका क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.२५.०० लक्षवरुन रु.१.०० कोटी, जिल्हा क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.४.०० कोटीवरुन रु.८.०० कोटी व विभागीय क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.१६.०० कोटीवरुन रु.२४.०० कोटी एवढी करण्यात आली आहे.

२. दिनांक २६.०३.२००३ च्या शासन निर्णयान्वये राज्य क्रीडा विकास समितीची स्थापना करण्यात करण्यात आली आहे. सदर समितीस विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलातील विविध क्रीडा सुविधांसाठी तांत्रिक, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार आहेत. सदर राज्य क्रीडा विकास समितीच्या दिनांक १०.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत मुंबई विभागीय क्रीडा संकुल, शिंपोली (कांदिवली) क्रीडा संकुलास रु.४८५.०० लक्ष इतकी तरतूद वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार क्रीडा व युवक संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये मुंबई विभागीय क्रीडा संकुलांसाठी एकूण रु.४८५.०० लक्ष तरतूद वितरीत करण्याची विनंती करण्यात आली आहे. त्याप्रमाणे

मुंबई विभागीय क्रीडा संकुलांसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त पार्श्वभूमीवर सन २०१६-१७ या वर्षाकरीता क्रीडा संकुलाची स्थापना या योजनेंतर्गत अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी मुंबई विभागीय क्रीडा संकुल, शिंपोली (कांदिवली) यासाठी रु.४८५.०० लक्ष इतकी तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता/ बाबींकरिता मंजूर केला आहे. त्याच बाबींकरिता खर्च करण्यात यावा.

२. सन २०१६-१७ मध्ये क्रीडा संकुलांची स्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.१४००.०० लक्ष एवढया तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, (१६) (०२) क्रीडा संकुलांची स्थापना (२२०४-१८२७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०७.२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१) वित्त विभागाच्या दिनांक २०.०४.२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये ८०% निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत

४.२) सन २०१६-१७ या वर्षाकरिता क्रीडा संकुलांची स्थापना याकरिता चालू आर्थिक वर्षात रु.१४००.०० लक्ष अर्थसंकल्पीत आहे.

४.३) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.५) दिनांक २४.०७.२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.६) उपरोक्त परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभाग दिनांक २०.०४.२०१६ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा यांना आहंरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २०.०४.२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६, ७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०११२११९७८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.30 11:22:46 +05'30'

**( कि. ल. संखे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर (क्रीडा संचालनालयामार्फत)
४. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
६. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
९. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई ( क्रीडा संचालनालयामार्फत),
११. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१२. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती (क्रीयुसे-१)